**सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील 'उप सचिव' संवर्गातील १ पद 'सह सचिव' या संवर्गात श्रेणीउन्नत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-३५२४/प्र.क्र.९४/आस्था-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ ऑगस्ट,२०२४

**वाचा :**

१) शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-ससप-११२३/प्र.क्र.१०१/प्रशा.१ (का.१४), दिनांक १६ मे,२०२४
२) शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-उसप-११२३/प्र.क्र.१०२/प्रशा.१ (का.१४), दिनांक ११ जून,२०२४
३) कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-साप्रआ २०२४/प्र.क्र.२२६/आस्था १ दिनांक १९ जून,२०२४
४) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक आढावा-१६१६/प्र.क्र.२१३/१९अ, दिनांक १७ जानेवारी,२०२३

**प्रस्तावना :**

सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १६ मे,२०२४ रोजीच्या शासन आदेशान्वये श्रीमती गीता राहुल कुलकर्णी, उप सचिव यांची या विभागात सह सचिव पदावर पदोन्नतीने पदस्थापना करण्यात आली आहे. त्यानुसार श्रीम.गीता कुलकर्णी, उपसचिव दिनांक १६ मे, २०२४ (म.नं.) रोजी या विभागात रुजू झाल्या आहेत.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १७ जानेवारी,२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतिबंधानुसार सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापनेवर सह सचिव व उप सचिव संवर्गातील एकूण १८ पदे मंजूर आहेत. त्यामध्ये सहसचिव संवर्गाची ८ पदे मंजूर करण्यात आली आहेत. तसेच सह सचिव संवर्गातील ८ पदे भरलेली आहेत. श्रीमती कुलकर्णी यांना सहसचिव पदावर पदस्थापना देण्यासाठी सह सचिव संवर्गातील पद रिक्त नाही.

३. सामान्य प्रशासन विभाग शासन आदेश दिनांक ११ जून,२०२४ अन्वये या विभागातील श्री.रामचंद्र कोंडिबा धनावडे, सहसचिव यांची प्रशासकीय कारणास्तव अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागात आंतरविभागीय बदली करण्यात आलेली आहे. श्री.धनावडे, सह सचिव यांना सदर पदावर रुजू होण्याकरीता कार्यालयीन आदेश दिनांक १९ जून,२०२४ (म.नं) पासून कार्यमुक्त करण्यात आलेले आहे. श्री.धनावडे, सह सचिव यांच्या बदलीमुळे संवर्गातील १ पद दिनांक २० जून,२०२४ पासून रिक्त आहे.

४. श्रीम.कुलकर्णी यांची सह सचिव पदावर पदस्थापना करण्यासाठी उप सचिव संवर्गातील १ पद दिनांक १६.०५.२०२४ (म.नं) ते १९.०६.२०२४ (म.नं) या कालावधीकरीता तात्पुरत्या स्वरुपात श्रेणी उन्नत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील उप सचिव संवर्गातील (वेतनस्तर एस-२५ : रु.७८८००-२०९२००) एक पद सह सचिव (वेतनस्तर एस-२७: रु.१२३१००-२१५९००) या पदात दिनांक १६.०५.२०२४ (म.नं) ते दिनांक १९.०६.२०२४ (म.नं) या कालावधीकरीता श्रेणी उन्नत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या श्रेणीवर्धित पदावर श्रीम. गीता कुलकर्णी, यांना दिनांक १६.०५.२०२४ (म.नं.) पासून सह सचिव पदावर पदस्थापना देण्यात येत आहे. दिनांक २०.०६.२०२४ (म.पू.) पासून श्रेणीउन्नत केलेले पद आपोआप मूळ पदात रुपांतरीत होईल.

३. याबाबत होणारा खर्च सामान्य प्रशासन विभागाच्या "मागणी ए-४, सचिवालय सर्वसाधारण सेवा, ०९०(००)(०१) सामान्य प्रशासन विभाग, २०५२००२५" या अर्थसंकल्पिय लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ २८८/सेवा-९, दि.२३.०८.२०२४ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे. त्याचा संकेताक २०२४०८२३१७१५५९८१०७ हा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KASHINATH SHINDE

Digitally signed by KIRAN KASHINATH SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=e87a32115497d05a2e91b08062bea862d1d55f490eb311d2f0e47e2fa1faf797, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9FF022F2E9C0F3C0DF2FD6BEE75DF1F6AE3C48080BAD7972572EE58C3F741862, cn=KIRAN KASHINATH SHINDE
Date: 2024.08.23 17:30:44 +05'30'

**( कि. का. शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. श्रीम.गीता कुलकर्णी, सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (रोखशा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (कार्यासन : सेवा-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (कार्यासन-आस्था-१), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. वैयक्तिक नस्ती / कार्यासन-आस्था-१.
१२. निवड नस्ती / कार्यासन-आस्था-२.